**ICAR-राष्ट्रीय डाळिंब संशोधन केंद्र, सोलापूर येथे राष्ट्रीय कृषि विकास योजना (RKVY) अंतर्गत जैविक किड नियंत्रण प्रयोगशाळा स्थापन करणेकरिता प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण १६२३/प्र.क्र.८१/१७-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २९/०३/२०२३.

वाचा :-

(१) कृषि विभागाचे पत्र क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र. १६८/भाग-१/१४-अे, दि. ३०/०१/२०२३.
(२) कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र. कृउसं(प्र)/गुनि-६/Biolab-Solapur/न.क्र.२४/८२३८ /२०२२, दि. ०३/०३/२०२३.
(३) ICAR- राष्ट्रीय अनार अनुसंधान केन्द्र, सोलापुर यांचे पत्र क्र. F.No.92/Lett./ RKVY/2022/1, दि. १६/०२/२०२३.

**प्रस्तावना :**

मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या दिनांक ११ जानेवारी, २०२३ रोजी झालेल्या ३२ व्या राज्यस्तरीय मंजुरी समितीच्या बैठकीत, ICAR- राष्ट्रीय डाळिंब संशोधन केंद्र, सोलापूर येथे "डाळिंबातील शाश्वत कीटक व्यवस्थापनासाठी जैविक किड नियंत्रण प्रयोगशाळा स्थापन करणे" (Setting up of Biocontrol production Laboratory to demonstrate and popularize the use of Biocontrol agents for Sustainable Pest Management in Pomegranate) हा प्रकल्प २ वर्षाच्या कालावधीसाठी राबविणेकरिता रु. ३४७.०० लाख इतक्या रक्कमेस मान्यता देण्यात आलेली आहे. सदर मान्यतेच्या अनुषंगाने संदर्भीय क्र. ३ अन्वये प्राप्त प्रस्तावानुसार सदर प्रकल्पास एकूण रु. ३४६.८० लाख इतका खर्च सादर करण्यात आलेला आहे. त्यानुषंगाने, सदर प्रकल्प सन २०२२-२३ व २०२३-२४ या कालावधीत राबविण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणे ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय डाळिंब संशोधन केंद्र, सोलापूर येथे जैविक किड नियंत्रण प्रयोगशाळा स्थापन करणेच्या अनुषंगाने प्रयोगशाळेचे बांधकाम, कर्मचारी प्रशिक्षण, उपकरणे खरेदी, काचसमान व रसायने खरेदी व इतर अनुषंगिक खर्च करणेकरिता सन २०२२-२३ व २०२३-२४ या कालावधीसाठी रु. ३४६.८० लाख रकमेचा प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर प्रकल्पाचे भौतिक व आर्थिक लक्ष्य खालीलप्रमाणे राहील.

**ICAR -राष्ट्रीय डाळिंब संशोधन केंद्र, सोलापूर येथे "Setting up of Biocontrol production Laboratory to demonstrate and popularize the use of Biocontrol agents for Sustainable Pest Management in Pomegranate" हा प्रकल्प राबविणे**

| अ.क्र. | बाब | अनुदान मागणी (रुपये लाख) | | |
|---|---|---|---|---|
| | | २०२२-२३ | २०२३-२४ | एकूण |
| १ | प्रयोगशाळेचे बांधकाम | १२० | --- | १२०.०० |
| २ | प्रशिक्षण | ४.०० | ४.०० | ८.०० |
| ३ | नवीन उपकरणे खरेदी करणे | १५०.०० | ---- | १५०.०० |
| ४ | काचसामान व प्लास्टिक सामग्री खरेदी करणे | १०.०० | ---- | १०.०० |
| ५ | रसायने खरेदी करणे | ७.०० | ३.०० | १०.०० |
| ६. | देखभाल (प्रयोगशाळा व जैविक किड) , सामुग्री हाताळणी | १५.०० | १०.०० | २५.०० |
| ७. | इतर (संगणक, इलेक्ट्रिक बॅलन्स, फ्रीज, ओवन इ.) | १७.०० | ---- | १७.०० |
| | **एकूण** | **३२३.००** | **१७.००** | **३४०.००** |
| | प्रशासकीय खर्च २ टक्के | ६.४६ | ०.३४ | ६.८० |
| | **एकूण एकंदर** | | | **३४६.८०** |

उपरोक्त निधी खर्च करण्यास संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण,) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सक्षम प्राधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच मंजूर निधीचे संबंधित संस्थेस वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार या योजनेचा आर्थिक व भौतिक अहवाल विहित मुदतीत केंद्र शासनाला व राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी. त्याचप्रमाणे चालू वित्तीय वर्ष संपुष्टात आल्यानंतर तात्काळ उपयोगिता प्रमाणपत्र ( Utilization Certificate ) न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२९१८०५१११४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Digitally signed by PIMPALE PRASHANT RAMESH
Date: 2023.03.29 18:11:58 +05'30'

( प्रशांत र. पिंपळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मंत्री ( कृषी )/ मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

३) प्रधान सचिव (कृषी ) यांचे स्वीय सहाय्यक (कृषि व पदुम विभाग) मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त ( कृषी), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर
६) सह सचिव (नि. व गु. नि.), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
७) कृषि संचालक (नि. व गु. नि. ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) अवर सचिव ( रा.कृ.वि.यो.) (१४-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९) उप संचालक (प्रयोगशाळा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ सोलापूर.
११) वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई
१२) नियोजन विभाग-१४३१, मंत्रालय, मुंबई
१३) कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) निवडनस्ती.